कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्याद्वारे मराठीत लिखित "प्रथम विश्वयुध्द" या ग्रंथाच्या हिंदी अनुवादाच्या प्रकाशनास व त्यासाठीच्या खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. हिंसाअ ७०२४(११)/प्र.क्र.२२०/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ जून, २०२५

**संदर्भ :-** सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी यांचे पत्र क्र. मराहिंसाअ/१०४१-१०४२/२०२५, दि. २४ एप्रिल, २०२५

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये हिंदी भाषा आणि साहित्याच्या विकासासाठी महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी कार्यरत असून या अकादमी द्वारे राज्यात हिंदी भाषा आणि साहित्याचे संवर्धन आणि विकास यासंबंधी विविध उपक्रम राबविण्यात येतात. त्यानुषंगाने, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्याद्वारे मराठीत लिखित "प्रथम विश्वयुध्द" या ग्रंथाच्या हिंदी अनुवादाच्या प्रकाशनास आणि त्यासाठीच्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्याद्वारे मराठीत लिखित "प्रथम विश्वयुध्द" या ग्रंथाच्या हिंदी अनुवादाच्या प्रकाशनास आणि त्यासाठीच्या खर्चास रुपये २,८९,०००/- इतक्या खर्चास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, (०८) हिंदी साहित्य अकादमी, (०८) (०१) हिंदी अकादमीची आस्थापना (कार्यक्रम), (२२०५ १६८८) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून मंजूर करण्यात येत आहे. सदर अनुदान खर्च झाल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त होणार असल्याने सदर अनुदान "सशर्त" मंजूर करण्यात येत आहे.

०३. यासाठी, सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्चास वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५, उपविभाग ३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७(२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

०५.        सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/ प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ७ एप्रिल,२०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सहसंचालक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

०६.        सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०६१८१३०९१२०८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.06.18 13:10:46 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, ओल्ड कस्टम हाऊस, विकास विभाग इमारत, शहिद भगतसिंग मार्ग, मुंबई ४०० ००१.
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४.